**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग,**
निर्णय क्रमांक अरजा-२४०५/प्र.क्र.१९/२००५/सेवा-८
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक

वाचा : (१) शासन निर्णय , वित्त विभाग क्रमांक अरजा-२४०२/प्र.क्र.२५/सेवा-८
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ७ ऑक्टोबर , २००२.
(२) शासन निर्णय ,वित्त विभाग क्रमांक अरजा-२४०२/प्र.क्र.५९//सेवा-८
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १४ मे, २००४.

## निर्णय

मार्च, २००२ च्या अर्थसंकल्पीय भाषणात शासनाची बचत करण्याच्या दृष्टीने शासकीय कर्मचाऱ्यांना "विशेष असाधारण रजा योजना" लागू करण्याचे धोरण घोषित करण्यात आले होते. सदरहू धोरण अंमलात आणण्यासाठी शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अरजा-२४०२/२५/सेवा-८, दिनांक ७ ऑक्टोबर, २००२ अन्वये शासकीय कर्मचाऱ्यांना "विशेष असाधारण रजा योजना" लागू करण्यात आली आहे. सदर रजा योजनेअंतर्गत अट क्र. १० अ नुसार पदोन्नतीसाठी पात्र ठरल्याच्या परिणामी किंवा म. ना. से. (निवृत्तिवेन) नियम १९८२ मधील नियम-१०, ६५ व ६६ च्या तरतुदीनुसार स्वेच्छा निवृत्ती घेण्यास पात्र ठरणाऱ्या कर्मचाऱ्यास मंजूर करण्यात आलेला रजेचा कालावधी कमी करता येईल. या दोन कारणांव्यतीरिक्त अन्य प्रकरणात विशेष असाधारण रजा घेतल्यानंतर तो कालावधी कमी करण्याची तरतूद नाही. तथापि, वैयक्तिक अडचणींमुळे मंजूर करण्यात आलेला विशेष असाधारण रजा कालावधी कमी करुन पुन्हा कार्यालयात रुजू करुन घेण्यासंदर्भाची बरीच प्रकरणे शासनास प्राप्त होत आहेत.

२. विशेष असाधारण रजा योजनेअंतर्गत मंजूर करण्यात आलेली रजा उपभोगून सेवेत पुन्हा रुजू झाल्यानंतर विशेष असाधारण रजेच्या कालावधीत ज्या नियमित वार्षिक वेतनवाढी देय झाल्या असत्या त्या वार्षिक वेतनवाढी काल्पनिकरित्या देय होतील अशी तरतूद आहे. तथापि, असाधारण रजेच्या सर्वसाधारण प्रकरणात (वैद्यकीय कारणाव्यतिरिक्त) वेतनवाढीसाठी असाधारण रजेचा कालावधी विचारात घेतला जात नाही.

३. तद्अनुषंगाने शासन आता असा आदेश देत आहे की, विशेष असाधारण रजा योजनेअंतर्गत रजा मंजूर केलेल्या कर्मचाऱ्याला किमान एक वर्ष इतकी विशेष असाधारण रजा उपभोगल्यानंतर उर्वरित रजेचा मंजूर कालावधी कमी करुन काल्पनिक वेतनवाढीचा फायदा न देता कार्यालयात रुजू करुन घेता येईल.

(कृ.मा.प.)

४. शासनाने असाही निर्णय घेतला आहे की, हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील व या दिनांकाला प्रलंबित असलेली प्रकरणेही या आदेशानुसार विनियमीत करण्यात येतील. मात्र, जी प्रकरणे यापूर्वीच अंतिमतः निकालात काढलेली आहेत त्या प्रकरणांचे पुनर्विलोकन करण्यात येणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( नसीमा म. शेख )
शासनाच्या उप सचिव.

प्रति,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई (८० प्रती),
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर (८० प्रती),
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई (४० प्रती),
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर (४० प्रती),
महालेखापाल (वाणिज्य लेखापरीक्षा) मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी ,मुंबई (४० प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव व सचिव, मंत्रालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय मुंबई,
मुख्य लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
राज्यपालांचे सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयाच्या निरनिराळया विभागांच्या अधिकाराखाली असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली,
वित्त विभागातील सर्व कार्यासने, (ग्रंथपाल ५ प्रती),
निवड नस्ती, कार्यासन सेवा-८, वित्त विभाग,

---

* पत्राने.